राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत नारवेल बेनवले ता. पेण जि. रायगड येथे खार भूमी योजना

# महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन )

शासन निर्णय क्र.आव्यप्र- २०१७/प्र.क्र.१९५/आव्यप्र-१

मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.

दि. १८ ऑक्टोबर, २०२१

**शासन निर्णय :**

जागतिक बँक सहाय्यित राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत नारवेल बेनवले येथे खार भूमी योजना ता. पेण, जि. रायगड नियुक्त केलेल्या प्रथमेश काकडे कन्स्ट्रक्शन (JV) यांनी जागतिक बँकेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार बँक हमी (Bank Guarantee) सदर केली आहे. सादर करण्यात आलेल्या बँक हमीस अनुसरून प्रथमेश काकडे कन्स्ट्रक्शन (JV) यांना करारातील GCC ४९.१ मधील तरतुदीनुसार १० टक्के अग्रिम रक्कम म्हणून एकूण रु. २,३४,११,८१८/- (रुपये दोन कोटी चौतीस लाख अकरा हजार आठशे अठरा फक्त) एवढा निधी प्रथमेश काकडे कन्स्ट्रक्शन (JV) यांना अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अग्रिम GCC ४९.२ नुसार साधनसामुग्री, साहित्य, प्लँट व मोबिलायझेशन खर्चासाठी वापरण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

प्रथमेश काकडे कन्स्ट्रक्शन (JV) यांना अदा करावयाच्या रकमेवर आयकर रु.४,१८,०६८/- (चार लक्ष अठरा हजार अडुसष्ट) (TDS) आणि सीजीएसटी /टीडीएस सीजीएसटी रु. २,०९,०३४/- (दोन लक्ष नऊ हजार चौतीस) व एसजीएसटी रु. २,०९,०३४/- (दोन लक्ष नऊ हजार चौतीस) वजा करुन उर्वरित रक्कम प्रदान करण्यात यावी.

सदर अग्रिम रक्कम डिसेंबर २०२१ पासून खाली नमूद केल्याप्रमाणे वसूल करण्यात यावी.

| महिना | डिसेंबर २०२१ | जानेवारी २०२२ | फेब्रुवारी २०२२ | मार्च २०२२ |
|---|---|---|---|---|
| Project Invoice Amount | १,९१,१६०२८/- | ३,३३,०३,११४/- | ४,३१,८३,५२२/- | ४,९८,२४,०२१/- |
| Recovery of advance in INR | ३०,००,०००/- | ५५,००,०००/- | ७०,००,०००/- | ७९,११,८८१/ |
| Balance Advance Amount (Advance issued INR २,३४,११,८१८.००) | २,०४,११,८१८/- | १,४९,११,८१८/- | ७९,११,८१८ | ०.००/- |

याबाबतचे देयक अधिदान व लेखा कार्यालय मुंबई यांना सादर करण्याकरिता श्री अर्जून पालव, लेखाधिकारी आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि श्रीमती राजश्री राऊत, वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य ८०, सर्वसाधारण, १०२ आपत्तीप्रवण क्षेत्रामध्ये नैसर्गिक आपत्कालीन परिस्थितीबाबतच्या तातडीच्या योजनांचे व्यवस्थापन करणे (०६) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे (०६) (०१) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे (७५ टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) ( २२४५ २६०३) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाअंतर्गत आर्थिक वर्ष २०२१-२२ या वर्षाकरीता करण्यात आलेल्या तरतुदीतून करण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५३/व्यय-९/२०१९, दि. २७/०६/२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११०१८१२२४१८९२१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अ.सं.फडतरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग तथा प्रकल्प संचालक राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प मंत्रालय, मुंबई.
४) प्रकल्प व्यवस्थापक तथा अधिक्षक अभियंता खारभूमी विकास मंडळ, ठाणे
५) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
६) राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प, संग्रहार्थ
७) आव्यप्र-१, संग्रहार्थ